स्वच्छ सर्वेक्षणामध्ये उच्चतम कामगिरी करणाऱ्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना देण्यात येणाऱ्या प्रोत्साहनात्मक बक्षिस रकमेच्या विनियोगाबाबतची सुधारित कार्यपध्दती

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय, क्रमांकः स्वमअ-२०२५/CN९५९८४८/नवि-३४
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : २१ मार्च, २०२५

वाचा :

(१) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक स्वमअ २०१७/प्र.क्र.२६४/नवि-३४, दि. ३०.१२. २०१७
(२) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक स्वमअ २०१९/प्र.क्र.९३/नवि-३४, दि. २५.०७.२०१९
(३) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक स्वमअ २०१९/प्र.क्र.१०५/नवि-३४, दि. ११.०९. २०१९
(४) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक स्वमअ २०१९/प्र.क्र.९४/नवि-३४, दि. २५ जुलै, २०१९
(५) शासन शुध्दीपत्रक, नगर विकास विभाग, क्रमांक स्वमअ २०१९/प्र.क्र.९४/नवि-३४, दि. १८ सप्टेंबर, २०१९

प्रस्तावना :

केंद्र शासनामार्फत स्वच्छ भारत अभियानांतर्गत दरवर्षी करण्यात येत असलेल्या "स्वच्छ सर्वेक्षण”मध्ये राज्यातील सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांची कामगीरी उच्चतम होण्याच्या दृष्टीने शहरांना प्रोत्साहन मिळावे म्हणून संदर्भिय क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये "स्वच्छ सर्वेक्षण-२०१८” करिता, संदर्भिय क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये "स्वच्छ सर्वेक्षण-२०१९" करिता व संदर्भिय क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये "स्वच्छ सर्वेक्षण-२०२०" करिता प्रोत्साहनात्मक बक्षीस योजना जाहीर करण्यात आलेली आहे. संदर्भाधिन क्रमांक ४ येथील शासन निर्णय व संदर्भाधिन क्रमांक ५ येथील शुध्दीपत्रकान्वये या प्रोत्साहनात्मक बक्षिस रकमेच्या विनियोगाची कार्यपध्दती विहित करण्यात आली आहे.

सध्या स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) २.० ची अंमलबजावणी वेगाने सुरु असून बऱ्याच नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडे घनकचरा व्यवस्थापन अथवा वापरलेल्या पाण्यावर प्रक्रिया करण्यासाठी जागा उपलब्ध नसल्यामुळे त्यांचे सविस्तर प्रकल्प अहवालास मंजूरी देता येत नसून त्यामुळे स्वच्छ महाराष्ट्र अभियानाची अंमलबजावणी करण्यामध्ये अडचणी येत आहेत. यास्तव अश्या महत्वाच्या मुलभूत गोष्टींसाठी त्याचप्रमाणे शहरे शाश्वतरित्या स्वच्छ व सुंदर राहतील या उद्देशाने स्वच्छ सर्वक्षण अंतर्गत चांगली कामगिरी करणाऱ्या शहरांना मिळालेल्या प्रोत्साहनपर बक्षिस रक्कमेतून खर्च

करण्यासाठी मंजूरी दयावयाच्या कामांमध्ये वाढ केल्यास शहरे स्वच्छ होऊन नागरिकांचे आरोग्य व राहणीमानाचा दर्जा देखील चांगला राहील.

त्यानुसार, स्वच्छ सर्वेक्षणामध्ये उच्चत्तम कामगिरी करणाऱ्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना देण्यात येणाऱ्या प्रोत्साहनात्मक बक्षिस रकमेच्या विनियोगाबाबतची संदर्भाधिन क्रमांक ४ येथील शासन निर्णय व संदर्भाधिन क्रमांक ५ येथील शासन शुध्दीपत्रकामध्ये नमूद केलेल्या अनुज्ञेय कामांमध्ये वाढ करुन, कामांना मंजूरी देण्याबाबत सुधारित कार्यपध्दती निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :

प्रस्तावनेत नमूद केलेल्या बाबींचा विचार करून स्वच्छ सर्वेक्षणामध्ये उच्चत्तम कामगिरी करणाऱ्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना देण्यात येणाऱ्या प्रोत्साहनात्मक बक्षिस रकमेच्या विनियोगाबाबतची सुधारित कार्यपध्दती शासन पुढील प्रमाणे निश्चित करीत आहे.

(अ) प्रोत्साहन अनुदानातून प्रस्तावित अनुज्ञेय कामे :-

१) घनकचरा व्यवस्थापनाच्या अनुषंगाने कामे करण्यासाठी :-

I. कचरा गोळा करून प्रक्रिया केंद्रापर्यंत वाहतूक करणे.

II. कचरा प्रक्रिया केंद्राची उभारणी व कचऱ्यावर प्रक्रिया करणे.

III. घनकचरा व्यवस्थापनाच्या अनुषंगाने मान्य करण्यात आलेल्या सविस्तर प्रकल्प अहवालामधील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा हिस्सा भरण्यासाठी.

IV. घनकचरा व्यवस्थापनाच्या अनुषंगीक इतर कामे व कामांची प्रचार प्रसिध्दी करणे.

V. घनकचरा व्यवस्थापनासाठी जागा उपलब्ध करुन घेणे.

VI. स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) २.० अंतर्गत बायोमायनिंग प्रकल्प हाती घेण्यात आला नसेल, तर अशा प्रकल्पांसाठी.

२) वापरलेल्या पाण्यावर प्रक्रिया करण्याच्या अनुषंगाने कामे :-

I. STP/FSTP उभारण्याचे काम करण्यासाठी

II. वापरलेल्या पाण्याचे नियोजन करण्याच्या अनुषंगाने मान्य करण्यात आलेल्या सविस्तर प्रकल्प अहवालामधील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा हिस्सा भरण्यासाठी.

III. STP/FSTP उभारण्याचे काम करण्यासाठी जागा उपलब्ध करुन घेणे.

३) मैला व्यवस्थापनाच्या अनुषंगाने कामे करण्यासाठी:-

I. शहरातील सेप्टीक टँक साफ करण्यासाठी आवश्यक असलेली व्हॅक्युम एमटिअर (Vacuum Emptier) यंत्रे/ मैला उपसा वाहने (De-sludging Vehicle) खरेदी करण्यासाठी.

II. सामुदायिक व सार्वजनिक शौचालयांचे बांधकाम व दुरुस्तीसाठी.

III. सामुदायिक व सार्वजनिक शौचालयांची काळजी घेण्यासाठी व्यक्ती अथवा संस्थेची नियुक्ती करण्यासाठी.

४) <u>वारंवार कचरा टाकला जाणाऱ्या ठिकाणी (GVP) व ओडीस्पॉट जागांचे सौदर्यीकरणाची कामे करण्यासाठी :-</u>

I. कचरा मुक्त शहराच्या संकल्पनेनुसार विविध ठिकाणांचे कचऱ्याचे ढिग काढून टाकल्यावर तेथील जागांचे (GVP) सुशोभीकरण करणे.

II. शहर हागणदारी मुक्त झाल्यानंतर पूर्वीच्या ओडीस्पॉट जागांचे सुशोभीकरण करण्यासाठी.

५) <u>स्वच्छ सर्वेक्षणाच्या अनुषंगाने कचरा मुक्त शहरांच्या तारांकित मानांकनाच्या अनुषंगाने आवश्यक कामे करण्यासाठी :-</u>

I. शहरात कचरा व्यवस्थापनाबाबत प्रचार, प्रसिध्दी करण्यासाठी संस्थेची नेमणूक करणे.

II. कचरा व्यवस्थापनाबाबत डिजिटल बोर्डच्या सहाय्याने प्रचार प्रसिध्दी करणेबाबत.

III. सफाई कर्मचाऱ्यांसाठी सुरक्षा साधने, गणवेश पुरविणे त्याचप्रमाणे विशेष योजना तयार करुन अमंलबजावणी करण्यासाठी.

IV. स्वच्छ सर्वेक्षण अंतर्गत देश पातळीवर उच्चतम कामगिरी केलेल्या शहरातील कामांची पाहणी करण्याकरिता Exposure Visits करण्यासाठी

V. तारांकित मानांकन प्राप्त करण्याच्या अनुषंगाने आवश्यक असणारी इतर कामे करण्यासाठी.

६) <u>शहर सौदर्यीकरणाची कामे करण्यासाठी :-</u>

I. शहरात पर्यावरण पूरक हरित पट्टयांचा विकास करण्यासाठी.

II. शहरातील Water Bodies (तलाव, जलाशये, विहिरी) चे संरक्षण / संवर्धन / सौंदर्यीकरण करण्यासाठी.

III. शहरातील मध्यवर्ती चौकांचे सुशोभीकरण करण्यासाठी.

IV. शहरातील दुभाजकांवर वृक्ष व फुलझाडांची लागवड करण्यासाठी व त्यांचे संरक्षण करण्यासाठी.

V. शहरातील शिल्पे, कारंजे, जलाशय, भुयारी मार्ग, वारसा स्थळे या ठिकाणी प्रकाश योजना व रोषनाई करण्यासाठी

VI. शहरातील उद्यांनाची स्वच्छता करुन Land Scaping करण्यासाठी.

VII. शहरामध्ये आकर्षक Selfie Point बनविण्यासाठी.

VIII. शहरातील उद्यांनामध्ये लहान मुलांसाठी खेळणी, जेष्ठ नागरीकांसाठी बाके बनविण्यासाठी, जॉगिंग ट्रॅक बनविण्यासाठी.

IX. शहरामध्ये सूचना फलक (Signage) लावण्यासाठी.

७) <u>वैशिष्टयपूर्ण योजना अंतर्गत अनुज्ञेय असलेली कामे करण्यासाठी</u>.

ब) प्रोत्साहन अनुदानातून घ्यावयाच्या कामांची मंजूरी

अनुज्ञेय केलेल्या कामांची निवड करून, नियमानुसार आवश्यक त्या प्राधिकरणाकडून/ अधिकाऱ्याकडून तांत्रिक मान्यता प्राप्त करून घेणे आवश्यक आहे.

आवश्यक ती तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुज्ञेय कामांसाठी सोबतच्या परिशिष्टामध्ये दर्शविल्यानुसार संबंधित प्राधिकाऱ्यांची प्रशासकीय मंजूरी घेणे बंधनकारक राहील.

२. नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडील प्रोत्साहनात्मक बक्षिसाची रक्कम या शासन निर्णयात विहित केलेल्या बाबींवरच होईल याची खातरजमा करण्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित आयुक्त, महानगरपालिका व मुख्याधिकारी, नगर परिषद / नगरपंचायत यांची राहील. यामध्ये कोणतीही कसूर झाल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित आयुक्त, महानगरपालिका / मुख्याधिकारी, नगर परिषद / नगरपंचायत यांच्यावर राहील व त्याकरीता ते शिस्तभंग कार्यवाहीस पात्र ठरतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२११७४१३८०५२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ANIRUDDHA
VENKTESH JEWLIKAR

Digitally signed by ANIRUDDHA VENKTESH JEWLIKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=29c6c42b5811a121a201ecd7aceaac3251c7d1ded31ff1b6e1a88d86b600c6bd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B986D51C7C29938C2BBB53D563F07DFC61C84B730CB9118407ECAB6A27C67C4C, cn=ANIRUDDHA VENKTESH JEWLIKAR
Date: 2025.03.21 17:42:31 +05'30'

**(अनिरुध्द व्यं जेवळीकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन,मलबार हिल, मुंबई.
२. मा.उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.राज्यमंत्री (नगर विकास), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
५. मा.प्रधान सचिव (नवि-२), यांचे स्वीय सहाय्यक
६. विभागीय आयुक्त, महसूल विभाग, (सर्व)
७. आयुक्त तथा संचालक, नगर परिषद संचालनालय, वरळी, मुंबई
८. आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
९. जिल्हाधिकारी (सर्व)
१०. मुख्याधिकारी, नगरपरिषद/ नगरपंचायत (सर्व)
११. राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान(नागरी) मुंबई
१२. निवड नस्ती (नवि-३४)

शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक स्वमअ-२०२५/CN९५९८४८/नवि-३४, दिनांक २१ मार्च, २०२५ सोबतचे परिशिष्ट

| अ .क्र. | अनुज्ञेय कामे | प्रशासकीय मंजूरीचे अधिकार | | | | अटी व शर्ती |
|---|---|---|---|---|---|---|
| | | जिल्हाधिकारी | संबंधित महानगरपालिका आयुक्त | प्रधान सचिव (२-नवि) | राज्य शासन | |
| १ | घनकचरा व्यवस्थापनाच्या अनुषंगाने कामे करण्यासाठी-: | | | | | |
| | I. कचरा गोळा करून प्रक्रिया केंद्रापर्यंत वाहतूक करणे. | (अ) अ वर्ग व ब वर्ग नगरपरिषदा:- रु. ४० लक्ष/ प्रति काम या मर्यादेत<br>(आ) क वर्ग नगरपरिषदा व नगरपंचायती :- रु. ३० लक्ष/ प्रति काम या मर्यादेत | सर्व महानगरपालिकांसाठी रु. ५० लक्ष/ प्रति काम या मर्यादेत | सर्व महानगरपालिका/ नगरपरिषदा/ नगरपंचायती :- रु. २.५ कोटी / प्रति काम या मर्यादेत | संपूर्ण अधिकार | i) सक्षम प्राधिकाऱ्याकडून तांत्रिक मान्यता प्राप्त करुन घेतल्यानंतर राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) संचालनालय यांचेमार्फत शासनास प्रस्ताव सादर करण्यात यावा.<br>ii)विहित कार्यपध्दतीचा अवलंब करावा<br>iii)कामाचे तुकडे पाडून काम करणे अनुज्ञेय नाही. |
| | II. कचरा प्रक्रिया केंद्राची उभारणी व कचऱ्यावर प्रक्रिया करणे. | | | | | |
| | III. घनकचरा व्यवस्थापनाच्या अनुषंगाने मान्य करण्यात आलेल्या सविस्तर प्रकल्प अहवालामधील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा हिस्सा भरण्यासाठी. | | | | | |
| | IV. घनकचरा व्यवस्थापनाच्या अनुषंगीक कामांची प्रचार प्रसिध्दी करणे. | | | | | |
| | V. घनकचरा व्यवस्थापनासाठी जागा उपलब्ध करुन घेणे. | | | | | |
| | VI. स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) २.० अंतर्गत बायोमायनिंग प्रकल्प हाती घेण्यात आला नसेल, तर अशा प्रकल्पांसाठी. | | | | | |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| २ | **वापरलेल्या पाण्यावर प्रक्रिया करण्याच्या अनुषंगाने कामे -:** | | | | | |
| | I. STP/FSTP उभारण्याचे काम करण्यासाठी<br>II. वापरलेल्या पाण्याचे नियोजन करण्याच्या अनुषंगाने मान्य करण्यात आलेल्या सविस्तर प्रकल्प अहवालामधील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा हिस्सा भरण्यासाठी .<br>III. STP/FSTP उभारण्याचे काम करण्यासाठी जागा उपलब्ध करुन घेणे. | अ) अ वर्ग व ब वर्ग नगरपरिषदा:- रु. ४० लक्ष/ प्रति काम या मर्यादेत<br>आ) क वर्ग नगरपरिषदा व नगरपंचायती :- रु. ३० लक्ष/ प्रति काम या मर्यादेत | सर्व महानगरपालिकांसाठी रु. ५० लक्ष/ प्रति काम या मर्यादेत | सर्व महानगरपालिका/ नगरपरिषदा/ नगरपंचायती :- रु. २.५ कोटी / प्रति काम या मर्यादेत | संपूर्ण अधिकार | i) सक्षम प्राधिकाऱ्याकडून तांत्रिक मान्यता प्राप्त करुन घेतल्यानंतर राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) संचालनालय यांचेमार्फत शासनास प्रस्ताव सादर करण्यात यावा.<br>ii)विहित कार्यपध्दतीचा अवलंब करावा<br>iii)कामाचे तुकडे पाडून काम करणे अनुज्ञेय नाही. |
| ३ | **मैला व्यवस्थापनाच्या अनुषंगाने कामे करण्यासाठी -:** | | | | | |
| | I. शहरातील सेप्टीक टँक साफ करण्यासाठी आवश्यक असलेली व्हॅक्युम एमटिअर (Vacuum Emptier) यंत्रे/ मैला उपसा वाहने (De-sludging Vehicle) खरेदी करण्यासाठी. | अ) अ वर्ग व ब वर्ग नगरपरिषदा:- रु. ४० लक्ष/ प्रति काम या मर्यादेत<br>आ) क वर्ग | सर्व महानगरपालिकांसाठी रु. ५० लक्ष/ प्रति काम या मर्यादेत | सर्व महानगरपालिका/ नगरपरिषदा/ नगरपंचायती :- रु. २.५ कोटी / प्रति काम या मर्यादेत | संपूर्ण अधिकार | i) सक्षम प्राधिकाऱ्याकडून तांत्रिक मान्यता प्राप्त करुन घेतल्यानंतर राज्य अभियान संचालक, स्वच्छ |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | II. सामुदायिक व सार्वजनिक शौचालयांचे बांधकाम व दुरुस्तीसाठी. | नगरपरिषदा व नगरपंचायती :- रु. ३० लक्ष/ प्रति काम या मर्यादेत | | | | महाराष्ट्र अभियान (नागरी) संचालनालय यांचेमार्फत शासनास प्रस्ताव सादर करण्यात यावा. ii)विहित कार्यपध्दतीचा अवलंब करावा iii)कामाचे तुकडे पाडून काम करणे अनुज्ञेय नाही. |
| | III. सामुदायिक व सार्वजनिक शौचालयांची काळजी घेण्यासाठी व्यक्ती अथवा संस्थेची नियुक्ती करण्यासाठी. | | | | | |
| ४ | **वारंवार कचरा टाकला जाणाऱ्या ठिकाणी )GVP) सौदर्यीकरणाची कामे करण्यासाठी**-: | | | | | |
| | I. कचरा मुक्त शहराच्या संकल्पनेनुसार विविध ठिकाणांचे कचऱ्याचे ढिग काढून टाकल्यावर तेथील जागांचे (GVP) सुशोभीकरण करणे. | अ) अ वर्ग व ब वर्ग नगरपरिषदा:- रु. ४० लक्ष/ प्रति काम या मर्यादेत आ) क वर्ग नगरपरिषदा व नगरपंचायती :- रु. ३० लक्ष/ प्रति काम या मर्यादेत | सर्व महानगरपालिकांसाठी रु. ५० लक्ष/ प्रति काम या मर्यादेत | सर्व महानगरपालिका/ नगरपरिषदा/ नगरपंचायती :- रु. २.५ कोटी / प्रति काम या मर्यादेत | संपूर्ण अधिकार | i) सक्षम प्राधिकाऱ्याकडून तांत्रिक मान्यता प्राप्त करुन घेतल्यानंतर राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) संचालनालय यांचेमार्फत शासनास प्रस्ताव सादर करण्यात यावा. ii)विहित कार्यपध्दतीचा |
| | II. शहर हागणदारी मुक्त झाल्यानंतर पूर्वीच्या ओडीस्पॉट जागांचे सुशोभीकरण करण्यासाठी. | | | | | |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | अवलंब करावा<br>iii)कामाचे तुकडे पाडून काम करणे अनुज्ञेय नाही. |
| ५ | **स्वच्छ सर्वेक्षणाच्या अनुषंगाने कचरा मुक्त शहरांच्या तारांकित मानांकनाच्या अनुषंगाने आवश्यक कामे करण्यासाठी -:** | | | | | |
| | I. शहरात कचरा व्यवस्थापनाबाबत प्रचार प्रसिध्दी करण्यासाठी संस्थेची नेमणूक करणे. | अ) अ वर्ग व ब वर्ग नगरपरिषदा:-<br>रु. ४० लक्ष/ प्रति काम या मर्यादेत<br>आ) क वर्ग नगरपरिषदा व नगरपंचायती :-<br>रु. ३० लक्ष/ प्रति काम या मर्यादेत | सर्व महानगरपालिकांसाठी रु. ५० लक्ष/ प्रति काम या मर्यादेत | सर्व महानगरपालिका/ नगरपरिषदा/ नगरपंचायती :-<br>रु. २.५ कोटी / प्रति काम या मर्यादेत | संपूर्ण अधिकार | i) सक्षम प्राधिकाऱ्याकडून तांत्रिक मान्यता प्राप्त करुन घेतल्यानंतर राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) संचालनालय यांचेमार्फत शासनास प्रस्ताव सादर करण्यात यावा.<br>ii)विहित कार्यपध्दतीचा अवलंब करावा<br>iii)कामाचे तुकडे पाडून काम करणे अनुज्ञेय नाही. |
| | II. कचरा व्यवस्थापनाबाबत डिजिटल बोर्डच्या सहाय्याने प्रचार प्रसिध्दी करणेबाबत. | | | | | |
| | III. सफाई कर्मचाऱ्यांसाठी सुरक्षा साधने, गणवेश पुरविणे त्याचप्रमाणे विशेष योजना तयार करुन अमंलबजावणी करण्यासाठी. | | | | | |
| | IV. स्वच्छ सर्वेक्षण अंतर्गत देश पातळीवर उच्चतम कामगिरी केलेल्या शहरातील कामांची पाहणी करण्याकरिता Exposure Visits करण्यासाठी | | | | | |
| | V. तारांकित मानांकन प्राप्त करण्याच्या अनुषंगाने आवश्यक असणारी इतर कामे करण्यासाठी. | | | | | |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ६ | **शहर सौदर्यीकरणाची कामे करण्यासाठी -:** | | | | | |
| | I. शहरात पर्यावरण पूरक हरित पट्टयांचा विकास करण्यासाठी | अ) अ वर्ग व ब वर्ग नगरपरिषदा:- रु. ४० लक्ष/ प्रति काम या मर्यादेत<br>आ) क वर्ग नगरपरिषदा व नगरपंचायती :- रु. ३० लक्ष/ प्रति काम या मर्यादेत | सर्व महानगरपालिकांसाठी रु. ५० लक्ष/ प्रति काम या मर्यादेत | सर्व महानगरपालिका/ नगरपरिषदा/ नगरपंचायती :- रु. २.५ कोटी / प्रति काम या मर्यादेत | संपूर्ण अधिकार | i) सक्षम प्राधिकाऱ्याकडून तांत्रिक मान्यता प्राप्त करुन घेतल्यानंतर राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) संचालनालय यांचेमार्फत शासनास प्रस्ताव सादर करण्यात यावा.<br>ii)विहित कार्यपध्दतीचा अवलंब करावा<br>iii)कामाचे तुकडे पाडून काम करणे अनुज्ञेय नाही. |
| | II. शहरातील Water Bodies (तलाव, जलाशये, विहिरी) चे संरक्षण / संवर्धन / सौंदर्यीकरण करण्यासाठी. | | | | | |
| | III. शहरातील मध्यवर्ती चौकांचे सुशोभीकरण करण्यासाठी | | | | | |
| | IV. शहरातील दुभाजकांवर वृक्ष व फुल झाडांची लागवड करण्यासाठी व त्यांचे संरक्षण करण्यासाठी. | | | | | |
| | V. शहरातील शिल्पे, कारंजे, जलाशय, भुयारी मार्ग, वारसा स्थळे या ठिकाणी प्रकाश योजना व रोषनाई करण्यासाठी | | | | | |
| | VI. शहरातील उद्यांनाची स्वच्छता करुन Land Scaping करण्यासाठी. | | | | | |
| | VII. शहरामध्ये आकर्षक Selfie Point बनविण्यासाठी. | | | | | |
| | VIII. शहरातील उद्यांनामध्ये लहान मुलांसाठी खेळणी, जेष्ठ नागरीकांसाठी बाके बनविण्यासाठी, जॉगिंग ट्रॅक बनविण्यासाठी. | | | | | |
| | IX. शहरामध्ये सूचना फलक (Signage) लावण्यासाठी. | | | | | |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ७ | **बक्षिसाची रक्कम वैशिष्टयपूर्ण योजना अंतर्गतची कामे करण्यासाठी वापरणेबाबत.** | | | | | |
| | स्वच्छ सर्वेक्षण अंतर्गत प्राप्त झालेली बक्षिसाची रक्कम वैशिष्टयपूर्ण योजने अंतर्गत अनुज्ञेय असणाऱ्या कामावर खर्च करावयाची झाल्यास. | अ) अ वर्ग व ब वर्ग नगरपरिषदा:- रु. ४० लक्ष/ प्रति काम या मर्यादेत<br>आ) क वर्ग नगरपरिषदा व नगरपंचायती :- रु. ३० लक्ष/ प्रति काम या मर्यादेत | सर्व महानगरपालिकांसाठी रु. ५० लक्ष/ प्रति काम या मर्यादेत | सर्व महानगरपालिका/ नगरपरिषदा/ नगरपंचायती :- रु. २.५ कोटी / प्रति काम या मर्यादेत | संपूर्ण अधिकार | i) सक्षम प्राधिकाऱ्याकडून तांत्रिक मान्यता प्राप्त करुन घेतल्यानंतर राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) संचालनालय यांचेमार्फत शासनास प्रस्ताव सादर करण्यात यावा.<br>ii)विहित कार्यपध्दतीचा अवलंब करावा<br>iii)कामाचे तुकडे पाडून काम करणे अनुज्ञेय नाही. |